**सहकारी सूतगिरण्यांची अर्थसहाय्यासाठी निवड करण्याबाबत.**
**श्री स्वामी विवेकानंद मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. कपिलापूरी, ता. परांडा, जि. धाराशिव.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र. सूतगि ३३२४/प्र.क्र.०८/टेक्स-१(ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सूतगि १११७/प्र.क्र.१९३/टेक्स १, दिनांक : २४ मार्च, १९९९.
२.शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतीक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : एमपीसी-१०९९/प्र.क्र.२४४/विघयो-२, दिनांक ३०.०३.२०००
३. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः सूतगि ३३१६/प्र.क्र.८१/टेक्स१(अ), दिनांक : १० जुलै, २०१७ .
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकःसूतगि३३१५/प्र.क्र.७८/टेक्स१(अ), दिनांक : २० जानेवारी , २०१८ .
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकःबैठक १५१६/प्र.क्र.६०/टेतस १ (अ), दिनांक : २० जुलै, २०१८.
६. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्रमांक : प्रकल्प-१२१५/प्र.क्र.५०/टेक्स १(अ), दिनांक १७.०६.२०२१.
७. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्रमांक : सूतगि-३३२१/प्र.क्र.४१/टेक्स-१(ब), दिनांक ३०.०७.२०२१
८. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकःधोरण-२०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५, दिनांक : ०२.०६.२०२३.
९. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः प्रकल्प १२२३/प्र.क्र.८/टेक्स-१ (ब), दिनांक २६.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय दि.०२.०६.२०२३ अन्वये राज्याच्या एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ ला मान्यता देण्यात आली आहे. यानुसार एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण आणि त्यातील सर्व संबंधित योजना हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या तारखेपासून

कार्यान्वित होईल व दि.३१.०३.२०२८ पर्यंत वैध राहील असे नमूद आहे. सदर धोरणामध्ये वस्त्रोद्योग क्षेत्राचा विकास आणि वस्त्रोद्योगासाठी निविष्ठांची उपलब्धता याच्या आधारावर महाराष्ट्राला या धोरणांतर्गत चार विविध झोन मध्ये विभागण्यात आलेले आहे. या धोरणांतर्गत नवीन सहकारी सूतगिरण्यांसाठी सभासद भागभांडवल, शासकीय भागभांडवल आणि वित्तीय संस्थांकडून घेण्यात येणारे कर्ज यांचे गुणोत्तर झोननिहाय वेगवेगळे आहे. त्यानुसार श्री स्वामी विवेकानंद मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. कपिलापूरी, ता. परांडा, जि. धाराशिव या खुल्या प्रवर्गातील सहकारी सूतगिरणीची शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत दि.१६.०३.२०२४ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळ बैठकीत मान्य करण्यात आलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:-

शासन निर्णय दि.०२.०६.२०२३ अन्वये राज्यात कार्यान्वित करण्यात आलेल्या एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ मधील तरतुदीनुसार श्री स्वामी विवेकानंद मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. कपिलापूरी, ता. परांडा, जि. धाराशिव या सूतगिरणीची १०:४०:५० या आकृतीबंधानुसार शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सूतगिरणीवर खालील बाबी बंधनकारक असतील-:

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतीक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : : एमपीसी-१०९९/प्र.क्र.२४४/विघयो-२, दिनांक ३०.०३.२००० तसेच, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दिनांक २४ मार्च, १९९९, दिनांक दि.१० जुलै, २०१७, दि.२० जानेवारी, २०१८, दि.१७.०६.२०२१, दिनांक ३०.०७.२०२१ व दिनांक ०२.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयां मधील अटी व शर्ती तसेच भविष्यात वेळोवेळी शासनाकडून करण्यात येणाऱ्या सुधारणा व नव्याने अंतर्भूत होणाऱ्या अटी व शर्ती या सूतगिरणीवर बंधनकारक राहतील. तसेच प्रत्येक टप्प्यावर सूतगिरणीने आवश्यक असणाऱ्या सर्व मंजुरी / मान्यता घेणे बंधनकारक आहे.

२) सदर सहकारी सूतगिरणीचे भविष्यात आंतरराज्यीय रुपांतरण करावयाचे असल्यास शासनाची पूर्ण देणी एकरकमी दिल्यानंतरच तशी परवानगी देण्यात येईल.

३) सहकारी सूतगिरणीच्या कार्यक्षेत्रात वाढ करावयाची झाल्यास सूतगिरणीचे स्थलांतर होणार नाही.

४) सहकारी सूतगिरणीच्या सध्या अस्तित्वात असणाऱ्या कार्यक्षेत्रातील व नव्याने वाढणाऱ्या कार्यक्षेत्रातील सर्व सभासदांचे आधारकार्ड सूतगिरणीच्या सभासदत्वाशी जोडणे (लिंक करणे) बंधनकारक असेल.

३. सदर शासन निर्णय मंत्रिमंडळाच्या दिनांक १६.०३.२०२४ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१५१०५३६७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2024.03.16 15:20:28 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री (गृह, विधी व न्याय ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) प्रादेशिक उपआयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर.
१०) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, छत्रपती संभाजी नगर

११) जिल्हाधिकारी, धाराशिव.
१२) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, धाराशिव.
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई - ४०० ००१.
१४) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर.
१५) नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई.
१६) वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१७) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१८) अध्यक्ष श्री स्वामी विवेकानंद मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. कपिलापूरी, ता. परांडा, जि. धाराशिव
१९) निवड नस्ती (टेक्स १ (अ) / (ब)).